**राज्यात भूमि अभिलेखांचे संगणकीकरण करणे व महसूल प्रशासन बळकट करणे आणि भूमि अभिलेखांचे अद्ययावतीकरण करणे या योजना व राष्ट्रीय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम अंतर्गत खरेदी समिती गठीत करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. राभूअ२०११/प्र.क्र.११२/ल १ सेल,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक ११.१०.२०११**

**वाचा** १) शासन निर्णय क्र संकीर्ण १०९४/प्र.क्र. ३/ल १, दि १७.१२.१९९४
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग,क्र संकीर्ण १२९४/प्र.क्र.४८३/ल १ दि. २३.१२.१९९४.

**प्रस्तावना :-**

राज्यात (१)भूमि अभिलेखांचे संगणकीकरण करणे व (२)महसूल प्रशासन बळकट करणे आणि भूमि अभिलेखांचे अद्ययावतीकरण करणे अशा अनुक्रमे १०० टक्के केंद्र शासन पुरस्कृत व ५० टक्के केंद्र शासन पुरस्कृत दोन योजना होत्या. राज्यात भूमि अभिलेखांचे संगणकीकरण करणे या योजनेअंतर्गत संगणक खरेदीसाठी शासन निर्णय, क्र. संकीर्ण १२९४/प्र.क्र.४८३/ल १, दि २३.१२.१९९४ अन्वये खरेदी समिती स्थापन केली होती तसेच महसूल प्रशासन बळकट करणे आणि भूमि अभिलेखांचे अद्ययावतीकरण करणे या योजनेअंतर्गत तांत्रिकदृष्टया उपयुक्त उपकरण/साहित्य खरेदी करण्याकरीता शासन निर्णय, क्र. संकीर्ण १०९४/प्र.क्र. ३/ल १, दि १७.१२.१९९४ अन्वये खरेदी समिती स्थापन करण्यात आली होती. तदनंतर या योजना बंद होऊन सन २००८-२००९ पासून राष्ट्रीय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम राज्यात राबविण्यात येत आहे. या सर्व योजनाअंतर्गत संगणक हार्डवेअर व सॉफ्टवेअर व अनुषंगिक बाबी, साहित्य/उपकरण खरेदी, तांत्रिक सेवा पुरविणे इ. करीता निविदा तयार करणे, निविदा मागविणे, निविदांची छाननी करणे याकरीता खरेदी समिती गठीत करण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्र. संकीर्ण १२९४/प्र.क्र.४८३/ल १ दि २३.१२.१९९४ व शासन निर्णय क्र. संकीर्ण १०९४/प्र.क्र. ३/ल १ दि १७.१२.१९९४ अधिक्रमित करून या शासन निर्णयाअन्वये जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.राज्य) पुणे यांच्या अधिनस्त कार्यालयांमध्ये संगणक व तदनुषंगिक उपकरणे बाबी, आज्ञावली, नेटवर्क, अन्य साहित्य व उपकरणे या बाबींच्या खरेदीसाठी पुढीलप्रमाणे खरेदी समिती गठीत करण्यास मान्यता देत आहे -

| | | |
|---|---|---|
| १. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.राज्य) पुणे | - | अध्यक्ष |
| २. संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य |
| ३. उपसंचालक भूमि अभिलेख सलग्न जमाबंदी आयुक्त (सर्वसाधारण) | - | सदस्य |
| ४. सह/उपसचिव, महसूल व वन विभाग | - | सदस्य |
| ५. सह/उपसचिव, वित्त विभाग | - | सदस्य |
| ६. सह/उपसचिव(उद्योग), उद्योग,उर्जा व कामगार विभाग | - | सदस्य |
| ७. उपमहानिर्देशक, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद, पुणे | - | सदस्य |
| ८. राज्य सूचना विज्ञान अधिकारी, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद, मुंबई | - | सदस्य |
| ९. अध्यक्षांच्या सहमतीने आवश्यकतेनुसार संबंधीत विषयाचे तज्ञ | - | निमंत्रीत सदस्य |
| १०. उपसंचालक, भूमि अभिलेख (राष्ट्रीय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम ) | - | सदस्य सचिव |

२. **उपरोक्त समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील -**

क) राष्ट्रीय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रमाअंतर्गत संगणक, युपीएस, अनुषंगिक आज्ञावली इ.साहित्य निविदा प्रक्रीयेद्वारे/राज्य शासनाच्या दर करारावर/केंद्र शासनाच्या दर करारावर/NICSI च्या दर करारावर खरेदी करणे/ खरेदी प्रस्ताव मंजूरीसाठी शासनास सादर करणे

ख) भूमि अभिलेख विभागासाठी जमिनीची मोजणी करण्याकरीता, प्रशिक्षणाकरीता ई.टी.एस, डिजीपीएस, प्लॉटर इ. आधुनिक साहित्य, प्लेन टेबल, हातकागद व अनुषंगिक पारंपारीक साहित्य निविदा प्रक्रीयेद्वारे/राज्य शासनाच्या दर करारावर/केंद्र शासनाच्या दर करारावर/NICSI च्या दर करारावर खरेदी करणे/ खरेदी प्रस्ताव मंजूरीसाठी शासनास सादर करणे.

ग) वरील आधुनिक साहित्याची देखभाल करण्याकरीता निविदा प्रक्रीया करणे.

घ) राष्ट्रीय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रमाअंतर्गत अथवा कार्यालयाच्या कामकाजाकरीता अनुषंगिक आज्ञावली विकसित करण्यासाठी निविदा प्रक्रीया करणे, प्रस्ताव मंजूरीसाठी शासनास सादर करणे.

च) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख यांच्या अधिनस्त कार्यालयांच्या कनेक्टिव्हिटीकरीता निविदा प्रक्रीया करणे, संस्था निश्चित करणे, प्रस्ताव मंजूरीसाठी शासनास सादर करणे.

छ) राष्ट्रीय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रमाअंतर्गत विविध बाबी उदा. अभिलेखांचे स्कॅनिंग, नकाशांचे डिजीटायझेशन, जमीनीची मोजणी करणे इ. करीता निविदा प्रक्रीया करणे व त्यास शासनाची मंजूरी घेणे

ज) राष्ट्रीय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रमाची राज्यात प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी आवश्यक त्या बाबींकरीता आणि आवश्यक ते साहित्य खरेदी करण्याकरीता निविदा प्रक्रीया करणे व त्यास शासनाची मंजूरी घेणे

झ) भूमि अभिलेखांचे संगणकीकरण करणे या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत व महसूल प्रशासन बळकट करणे अणि भूमि अभिलेखांचे अद्ययावतीकरण करणे या ५० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत अखर्चीत निधीच्या विनियोगाकरीता वरीलप्रमाणे सर्व कार्यवाही करणे

ट) राष्ट्रीय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम, भूमि अभिलेखांचे संगणकीकरण करणे, महसूल प्रशासन बळकट करणे अणि भूमि अभिलेखांचे अद्ययावतीकरण करणे या तीनही योजना अंतर्गत यापूर्वी झालेल्या व नंतर होणा-या साहित्याची खरेदी किंवा सेवा याबाबत साहित्य पुरवठादार / सेवा पुरवठादार यांचे सोबत वाद उत्पन्न झाल्यास शासनाचे हित लक्षात घेऊन तडजोड करणे

३. विभाग प्रमुखांना प्रत्यायोजित केलेल्या वित्तीय अधिकाराच्या मर्यादेत संगणकीकरण व अन्य बाबींकरीता खरेदीचे अधिकार राहतील.

४. संगणकीकरणासंदर्भात रू. ५ कोटीपर्यतच्या बाबींकरीता प्रकल्प अंमलबजावणी समितीची मान्यता घ्यावी तर रू. ५ कोटीपेक्षा अधिक बाबींकरीता उच्चाधिकार समितीची मान्यता घेण्यात यावी.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र.२६८/व्यय १०, दि. ७.१०.२०११ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. या शासन निर्णयाची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक सांकेतांक २०१११०१११२२११४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(विद्या वाघमारे)
कार्यासन अधिकारी,
महसूल व वन विभाग.

प्रति,

सचिव, माहिती तंत्रज्ञान, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई
उपसचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
उप सचिव(उद्योग), उद्योग,उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
उपमहानिर्देशक, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद, पुणे
राज्य सूचना विज्ञान अधिकारी, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद, मुंबई
उपमहानिर्देशक, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद, पुणे
उपसंचालक, भूमि अभिलेख सलग्न जमाबंदी आयुक्त (सर्वसाधारण), पुणे
उपसंचालक, भूमि अभिलेख, (राष्ट्रीय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम), पुणे